सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, कोल्हापूर यांना देण्यात यावयाच्या अनुदानाचे वाटप मुख्य लेखाशिर्ष-२४१५०३२१. ३६ - सहायक अनुदाने वेतन (दुसरा हप्ता)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०२३/प्र.क्र. ३३/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
दिनांक : २१ जुलै, २०२३.

वाचा :

१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि. १७.०९.१९९३.
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक- प्रशिक्षण ११९९/ प्र.क्र.५८१/६१, दि. २३.९.१९९८
३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि. १२.६.२००१.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२२.
५) शासन निर्णय ग्राम विकास विभाग अनुग्रा २०२३/प्र.क्र.३३/आस्था १५, दि.१९.०४.२०२३.

प्रस्तावना : -

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता २४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण ०१- पीक संवर्धन, १२०- इतर संस्थांना सहाय्य, (०१)(०२) कोल्हापूर जिल्ह्यातील गारगोटी येथे ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे (अनिवार्य) (संकेतांक क्र. २४१५ ०३२१), (मागणी क्र.एल-३) अंतर्गत ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जिल्हा कोल्हापूर यांना ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रु.८९१.०० हजार (रुपये आठ लक्ष एक्याण्णव हजार फक्त) व ३६ सहायक अनुदाने (वेतन) साठी रु.१०८३३.०० हजार (रुपये एक कोटी आठ लक्ष तेहत्तीस हजार फक्त) असे एकूण रु.११७२४.०० हजार (रुपये एक कोटी सतरा लक्ष चोवीस हजार फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी दुसरा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ नुसार सन २०२३-२४ या अर्थसंकल्पिय मंजूर अनुदानातून निधी वितरीत करण्याच्या वित्त विभागाच्या सूचना आहेत. त्याअनुषंगाने ग्रामसवेक प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, कोल्हापूर यांना आतापर्यंत अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता २०% मर्यादेत रु.१७८.२०० हजार (रुपये एक लक्ष, अठ्याहत्तर हजार, दोनशे फक्त) तसेच ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता २०% मर्यादेत रक्कम रु. २१६६.६० हजार (रुपये एकवीस लक्ष, सहासष्ठ हजार, सहाशे फक्त) असे एकुण रु.२३४४.८० हजार (रुपये तेवीस लक्ष, चव्वेचाळीस हजार, आठशे फक्त) इतके अनुदान संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

२. आता, ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पिय तरतुदीच्या १४% मर्यादेत निधी वित्त विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर मर्यादेस अधिन राहून ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर यांना ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पिय तरतुदीच्या १४% मर्यादेत रु.१५१६.६२० हजार (रुपये पंधरा लक्ष, सोळा हजार, सहाशे वीस फक्त) इतका निधी दुसरा हप्ता म्हणून वितरित करण्यात येत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००1 अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने उपायुक्त (आस्था), पुणे विभाग, पुणे यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा खर्च " मागणी क्र.एल ३,"२४१५, कृषिविषयक संशोधन व शिक्षण संकेतांक क्र. (२४१५ ०३२१) ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे.सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन / वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतन / वेतनेतर करिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन / वेतनेतरकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

७. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

८. हा शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग १, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार अनुक्रमांक ४, परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०७२११००७५८७९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Madhuri Sonawane

Digitally signed by Madhuri Sonawane
DN: cn=Madhuri Sonawane, o=Rural Development Department, ou, email=madhuri.sonawane@nic.in, c=IN
Date: 2023.07.21 15:15:34 +05'30'

(माधुरी सोनावणे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत-

१) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
२) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे (दोन प्रती)
३) संचालक, श्री.मौनी विद्यापीठ गारगोटी, जि.कोल्हापूर
४) उपायुक्त (आस्था) विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे (नोंदणीकृत डाकेने)
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई. (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर. (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
८) वित्त विभाग (का.क्र.अर्थसंकल्प-१७/व्यय १५)
९) प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर (२ प्रतींसह)
१०) कार्यासन.क्र. वित्त-१ व वित्त-७ ग्राम विकास विभाग
११) निवड नस्ती का.क्र. आस्था-१५